पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर पुरस्कारासाठी निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-अहोपु-२०१९/प्र.क्र.४८/का-१०**
नविन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख- १५ फेब्रुवारी, २०२०.

वाचा :-

१. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्र.अहोपु-२०१७/प्र.क्र.६८/का-१०, दि.१७ मे, २०१८.
२. शासन शुध्दीपत्रक, महिला व बाल विकास विभाग, क्र.अहोपु-२०१५/प्र.क्र.६८/का-१०, दि.३० ऑगस्ट, २०१८.
३. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.१ एप्रिल, २०१९.
४. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.८ जुलै, २०१९.
५. शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्र.अहोपु-२०१५/प्र.क्र.६८/का-१०, दि.२१ जानेवारी, २०२०.

प्रस्तावना :-

महिला व बाल विकास क्षेत्रामध्ये उत्कृष्ट काम करीत असलेल्या समाजसेविकांच्या व संस्थांच्या कामाची दाद घ्यावी व इतर समाजसेविकांना / संस्थांना त्यापासून प्रेरणा मिळावी, जेणेकरुन महिला व बालकांच्या उत्थानासाठी समाजसेविका व संस्था सरसावून पुढे याव्यात, यासाठी महिला व बाल कल्याण क्षेत्रात उत्कृष्ट कार्य करीत असलेल्या राज्यातील समाजसेविकांना व संस्थांना “पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर पुरस्कार” देवून सन १९९६-९७ वर्षापासून गौरवण्यात येत आहे.

२. वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.४ येथील दि.८.७.२०१९ रोजीच्या परिपत्रकानुसार मागणी क्र.एक्स-०१ याखाली विभागास उपलब्ध करण्यात आलेले “महाराष्ट्र विनियोजन विधेयक, २०१९” विचारात घेता, पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर पुरस्कारासाठी अर्थसंकल्पीत विद्यमान ₹ ६५,७७,०००/- (अक्षरी रुपये पासष्ट लाख सत्त्याहत्तर हजार फक्त) पैकी ₹ २५,२०,०००/- (अक्षरी रुपये पंचवीस लाख वीस हजार फक्त) इतका निधी संदर्भाधीन क्र.५ येथील दि.२१.१.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर पुरस्कारासाठी अर्थसंकल्पीत विद्यमान ₹ ६५,७७,०००/- तरतुदीपैकी ८०% च्या मर्यादेत निधी वितरीत करण्यासाठी यापूर्वी दि.२१.१.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला ₹ २५,२०,०००/- (अक्षरी रुपये पंचवीस लाख वीस हजार फक्त) इतका निधी वगळून उर्वरीत ₹ २७,४१,६००/- (अक्षरी रुपये सत्तावीस लक्ष एक्केचाळीस हजार सहाशे फक्त) इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सदर शासन निर्णयान्वये **₹ २७,४१,६००/- (अक्षरी रुपये सत्तावीस लक्ष एक्केचाळीस हजार सहाशे फक्त)** इतका निधी पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर पुरस्कारसाठी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. याकरीता आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. वितरित करण्यात आलेल्या निधी खर्च करताना वित्त विभागाने वेळोवेळी घातलेल्या अटी, शर्ती, नियम यांचे काटेकोरपणे पालन करण्याची दक्षता आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांनी घ्यावी. तसेच वितरित केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

३. सदरचा खर्च मागणी क्र.एक्स-१, २२३५- सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, १०३ महिला कल्याण (१६) पुरस्कार (१६) (०१) पुण्यश्लोक अहिल्याबाई होळकर पुरस्कार (२२३५ २४४८) या लेखाशिर्षांतर्गत ०५, बक्षिसे या उद्दिष्टासाठी सन २०१९-२० या वित्तीय वर्षात उपलब्ध असलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.८ जुलै, २०१९ रोजीच्या परिपत्रकातील परिच्छेद क्र.४ ते १९ मधील मार्गदर्शक सूचना व त्या विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००२१५१५२४४९४८३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Smita Dattatray Nivatkar

Digitally signed by Smita Dattatray Nivatkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women and Child Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3fa46cf1e928518ffc98619187a1ef6de2dd57c16934e9cb6672cc02aa258b08, serialNumber=f9bd2a7c214922f8f4939e80711ece461c9dfd9c679b28f98e79475c5ea90e21, cn=Smita Dattatray Nivatkar
Date: 2020.02.15 15:26:45 +05'30'

( स्मिता निवतकर )
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
३. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
६. जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर
७. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
८. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९. अवर सचिव (अर्थसंकल्प), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सदर निधी बी.डी.एस. प्रणालीवर वितरीत करण्याच्या विनंतीसह अग्रेषित.
१०. निवड नस्ती, का-१०.